**बाह्ययंत्रणेकडून /आऊटसोर्सिंगद्वारे कामे करुन घेण्याबाबत मार्गदर्शक सूचना**

**महाराष्ट्र शासन**

**वित्त विभाग**

**शासन परिपत्रक, क्र. संकीर्ण -२०२०/प्र.क्र.२४/२०/आ.पु.क.**

मंत्रालय,मुंबई ४०० ०३२

दि. ३० सप्टेंबर २०२०

**संदर्भः** १) वित्त विभाग शासन परिपत्रक, क्र. पदनि-२०१०/प्र.क्र.८४/१०/ वि.सु.१ दि.२७.०९.२०१०

२) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. पदनि-२०१३/प्र.क्र.११/१३/वि.सु.१ दि.०२.०२.२०१३

३) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. पदनि-२०१३/प्र.क्र.११२/१३/वि.सु.१ दि.०२.१२.२०१३

४) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. पदनि-१०१०/प्र.क्र.८३/१०वि.सु.१ दि.०२.०८.२०१६

५) कौशल्य विकास व उद्योजकता विभाग शासन परिपत्रकःकौविउ २०१८/प्र.क्र.५४ (भाग- ३)/रोस्वरो-१ दि. ०२.०३.२०१९

**परिपत्रक**

प्रशासनावरील खर्च आटोक्यात ठेऊन विकास कामांसाठी पुरेसा निधी उपलब्ध होण्याच्या दृष्टीने शक्य असेल तेथे नवीन पदनिर्मिती न करता, सहजरीत्या जी कामे बाह्ययंत्रणेकडून करुन घेता येतील अशी कामे, बाह्ययंत्रणेकडून (संस्थेकडून/ठेकेदाराकडून)करुन घेण्यासंदर्भात संदर्भ क्र. १ ते ४ येथील शासन परिपत्रकांद्वारे सूचित करण्यात आले आहे. तथापि,राज्यातील पदवीधर अंशकालीन उमेदवारांना विशेष बाब म्हणून नोकरीची संधी उपलब्ध करुन देण्याकरीता, मा. मंत्रीमंडळाने दि.११.१२.२०१८च्या बैठकीत,“बाह्ययंत्रणेद्वारे भरण्यासाठी मंजुर असलेल्या रिक्त पदांवर बाह्ययंत्रणेद्वारे संस्था/कंपनी यांच्याकडून उमेदवारांची नेमणूक करण्याच्या ” शासनाच्या प्रचलित धोरणामधून पदवीधर अंशकालीन उमेदवारांना सूट देऊन, त्यांना वैयक्तीकरित्या प्राधान्याने नेमणूक देण्याबाबतचा निर्णय घेतला आहे. सदर मंत्रीमंडळ निर्णयाच्या अनुषंगाने, राज्य शासनाच्या व राज्य शासनाच्या अधिपत्याखालील कार्यालयीन आस्थापनेवर बाह्ययंत्रणेद्वारे भरावयाच्या रिक्त पदावर संस्था/कंपनी यांच्यामार्फत सेवा घेण्यापूर्वी, पदवीधर अंशकालीन कर्मचारी यांना करार तत्वावर नियुक्ती देण्याकरीता अनुसरावयाची कार्यपद्धती कौशल्य विकास व उद्योजकता विभागाने दि.०२.०३.२०१९ च्या शासन परिपत्रकान्वये विहित केली आहे. तसेच, पदवीधर अंशकालीन उमेदवारांना प्राथम्याने नियुक्ती देण्याच्या सूचना दिल्या आहेत. तथापि, विविध विभागांकडून बाह्ययंत्रणेद्वारे (संस्था/कंपनी) सेवा घेताना, सदर सूचनेनुसार पदवीधर अंशकालीन उमेदवारांना प्राधान्याने नियुक्ती न देता, अन्य कंपनी/एजन्सीबाबत सूचना दिल्या जातात व त्यांच्याकडून कर्मचारी घेतले जातात, असे निदर्शनास आले आहे. यास्तव, शासकीय विभाग व इतर शासकीय कार्यालयांना पुढीलप्रमाणे सूचित करण्यात येत आहे.

१.राज्य शासनाच्या व राज्य शासनाच्या अधिपत्याखालील कार्यालयीन आस्थापनेवर तसेच, शासन अनुदानित संस्थांमध्ये व राज्यभरात पी.पी.पी. तत्वावर सुरु असलेल्या प्रकल्पामध्ये ज्या पदांच्या सेवा वैयक्तिकरित्या संस्था/ठेकेदाराकडून घेण्यात येतात अशा, लिपिक टंकलेखक, शिपाई, वाहनचालक यांसारख्या कार्यालयाच्या कामकाजाशी प्रत्यक्ष संबंध येणा-या कुशल पदांच्या सेवा बाह्ययंत्रणेद्वारे संस्था/ठेकेदारामार्फत घेण्यापूर्वी, अशा सेवा सर्वप्रथम पदवीधर अंशकालीन उमेदवारांनामधून घेण्यात याव्यात. याकरीता संदर्भ क्र. ५ येथील कौशल्य विकास व उद्योजकता विभागाच्या दि. ०२.०३.२०१९च्या शासन परिपत्रकान्वये विहित केलेली कार्यपद्धती अनुसरावी.

२. बाह्ययंत्रणेद्वारे सेवा घेताना, पदवीधर अंशकालीन उमेदवारांच्या यादीमध्ये योग्य शैक्षणिक व व्यावसायिक अर्हताधारक उमेदवार उपलब्ध न झाल्यास, तसे स्पष्ट नमुद करुन अन्य बाह्ययंत्रणेकडुन (एजन्सी/कंपनी) सेवा घेण्यात याव्यात.

३. बाह्ययंत्रणेकडून (संस्थेकडून/ठेकेदाराकडून/पदवीधर अंशकालीन उमेदवारांकडून) सेवा उपलब्ध करुन घेण्यासंदर्भात संदर्भ क्र.१ ते ४ येथील शासन परिपत्रकान्वये निर्गमित करण्यात आलेल्या मार्गदर्शक सूचनांचे पालन करण्याची दक्षता घ्यावी .

४. बाह्ययंत्रणेकडील कर्मचा-यांचे कोणतेही उत्तरदायित्व शासनावर येणार नाही, याची दक्षता घेणे आवश्यक आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध असुन त्याचा संगणक संकेतांक क्र. २०२००९३०१६००४०५५०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने .

Vinayak Arvind Dhotre

Digitally signed by Vinayak Arvind Dhotre
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Finance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=857ec0d4ffa11afd448c1db99e6d5447265170ecc87e6e5c74be1217bec62ba9, serialNumber=eed64ff5f3811d4c3522d8713ed9a9090e2a4f33552eea2364d17d782c35e926, cn=Vinayak Arvind Dhotre
Date: 2020.09.30 16:04:13 +05'30'

**(वि. अ. धोत्रे)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.विरोधी पक्ष नेता महाराष्ट्र विधानसभा /विधानपरिषद , मुंबई

२.महाराष्ट्र विधानसभा /विधानपरिषद यांचे सर्व सदस्य

३. मा. राज्यपालांचे सचिव

४. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव

५. सर्व मंत्री /राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव /स्वीय सहायक

६. मा. मुख्य सचिव यांचे उपसचिव

७. सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग.

८. सर्व सह सचिव/ उप सचिव / अवर सचिव /कक्ष अधिकारी,वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

९. महासंचालक , माहिती व जनसंपर्क संचालनालय,मुंबई.

१०. निवड नस्ती (आ.पु.क.) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई -४०० ०३२